राज्यातील सागरी सुरक्षेसाठी वेगवान बोटी चालविण्याकरिता पोलीस उप- निरीक्षक सेकंड क्लास मास्टर, गट-ब (अराजपत्रित) आणि पोलीस उप-निरीक्षक फर्स्ट क्लास इंजिन ड्रायव्हर, गट-ब (अराजपत्रित) ची १०८ पदेकरार पध्दतीने एकत्रित मानधनावर भरण्यास मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमटीएस-०३१७/प्र.क्र.५९/पोल-४,**

**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,**

**दिनांक :-१५ मार्च, २०१७.**

**वाचा :-**

१) गृह विभाग, शासन निर्णय क्र. एमटीएस/०३११/प्र.क्र.६७७/पु.बा.३९/पोल-४, दि.१५.१२.२०१५.

२) आयुक्त,राज्यवार्ता विभाग,महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे क्रमांक सीएस/एसीएस/सी. मॅनपॉवर/१५ १७/-१३६, दि. ०६.०१.२०१७.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र पोलीस दलाकडे असलेल्या वेगवान बोटी चालविण्याकरीता फर्स्ट/सेकंड क्लास मास्टरची (प्रत्यक्षात बोट चालवणारे) ९३ व फर्स्ट क्लास इंजिन ड्रायव्हरची (बोट इंजिनाची देखभाल करणारे) ९३ याप्रमाणे एकूण १८६ पदे करारपध्दतीने व एकत्रित रु.२५,०००/- इतक्या मानधनावर भरण्यास गृह विभाग,शासन निर्णय,दि.१५.१२.२०१५ अन्वये मान्यता देण्यात आली होती.

२. सदर १८६ पदांपैकी सध्या कार्यरत असलेल्या १०८ (पोलीस उप-निरीक्षक सेकंड क्लास मास्टर - ७७ व पोलीस उप-निरीक्षक फर्स्ट क्लास इंजिन ड्रायव्हर-३१) पदांना, तांत्रिक मनुष्य बळास विहित प्रक्रियेव्दारे कायमस्वरुपी तांत्रिक मनुष्यबळ उपलब्ध होईपर्यंत (पावसाळी कालावधी २ ते ३ महिने वगळून) एकत्रित रु.२५,०००/- इतक्या मानधनावर दि.३१.१०.२०१७ पर्यंत खालील अटींच्या अधिन राहून मुदतवाढ देऊन पुनर्नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

१. कराराचा कालावधी संपुष्टात येताच नियुक्ती संपुष्टात येईल व सदर पदावर केलेल्या सेवेमुळे सदर पदावर किंवा दुसऱ्या कोणत्याही अन्य पदावर नियुक्ती मिळण्याचा/समावेशनाचा हक्क प्राप्त होणार नाही.

२. सदर पदांना मुदतवाढ देतांना शासन निर्णय, सा.प्र.वि. दि.१५.२.१९९५ व दि.१४.१.२०१० मधील अटी व शर्तीचे कटाक्षाने पालन करावे.

३. सदर प्रकरणी मुंबई उच्च न्यायालयातील जनहित याचिका ८५/२००८ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या आदेशाचा भंग होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

४. अशा प्रकारे करार नियुक्तीमुळे सद्यस्थितीत शासन सेवेत असलेल्या कोणत्याही अधिकाऱ्याच्या पदोन्नतीच्या संधीवर प्रतिकूल परिणाम होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

२. सदर शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ९/२०१७/का.१३, दि.७.२.२०१७ व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र.८६/१७/व्यय-७, दि.२८.२.०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१७१६४३११३८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Sunil J Sovitkar

Digitally signed by Sunil J Sovitkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3d8ee31cf28155a3c297f1c4b60ba7aa7197b86c24ce4eb660c798a1afe6f9cc, cn=Sunil J Sovitkar
Date: 2017.03.17 16:44:58 +05'30'

**( सु.ज.सोवितकर )**
**उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२. पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई,
३. आयुक्त,राज्य गुप्तवार्ता विभाग,महाराष्ट्र राज्य, मुंबई,
४. पोलीस आयुक्त,नवी मुंबई,
५. अपर पोलीस महासंचालक,प्रशिक्षण व खास पथके,मुंबई,
६. विशेष पोलीस महानिरीक्षक,मोटार परिवहन विभाग,महाराष्ट्र राज्य,पुणे,
७. महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षक/लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र मुंबई/नागपूर,
८. अधिदान व लेखाअधिकारी,मुंबई,
९. निवासी व लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई,
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
११. पोलीस अधीक्षक ठाणे ग्रामीण/रायगड/रत्नागिरी/सिंधुदूर्ग,
१२. पोलीस उपायुक्त,मोटार परिवहन विभाग,मुंबई,
१३. सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१३),मंत्रालय,मुंबई,
१४. वित्त विभाग (व्यय/सेवा-६) मंत्रालय,मुंबई,
१५. निवड नस्ती/गृह विभाग,पोल-४ मंत्रालय,मुंबई.